**राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात आरसीएच कार्यक्रमांतर्गत संगणकीय उपकरणे (टॅबलेट) खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-०११९/प्र.क्र.०४/आरोग्य-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ११ जानेवारी, २०१९.

**वाचा :-**

१) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण, पुणे यांचे पत्र क्र.राकुकका/MCTS/कक्ष १५ ड/नस्ती क्र./६००८६-८९/२०१८, दिनांक २३ ऑक्टोंबर, २०१८.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.प्रशामा-२०१७/प्र.क्र.३४९/आ-७, दिनांक २८ सप्टेंबर, २०१७.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१७-१८ पीआयपी अंतर्गत आरसीएच कार्यक्रमांतर्गत संगणकीय उपकरणे (टॅबलेट) खरेदीसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, काही तांत्रिक कारणास्तव सदरची खरेदी प्रक्रिया होऊ शकली नाही. त्यामुळे अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण व माताबाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे यांच्याकडील प्रस्तावानूसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात आरसीएच कार्यक्रमांतर्गत संगणकीय उपकरणे (टॅबलेट) खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य कुटुंब कल्याण, पुणे यांच्या संदर्भीय दिनांक २३ ऑक्टोंबर, २०१८ च्या पत्राच्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आरसीएच (राष्ट्रीय प्रजननक्षम बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत) माता व बालकांची संगणकीय नोंदणी करण्यासाठी पुणे महानगरपालिका अंतर्गत कार्यरत नागरी आरोग्य केंद्रांसाठी अंदाजित प्रति नग रु.१०,०००/- दरानूसार एकूण ८१ संगणकीय टॅबलेट खरेदी करण्यासाठी सन २०१८-१९ मधील मंजुर पीआयपीमध्ये असलेल्या कमिटेड अनुदानातून रु.८.१० लक्ष रकमेच्या लॅपटॉप/ टॅबलेट खरेदीसाठी पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | लेखाशिर्ष सांकेतांक FMR Code | खरेदी करावयाची बाब | मंजुर निधी Approved PIP 2018-19 Committed Rs. in Lakh | प्रस्तावित खरेदी Procurement Proposal Rs. in Lakh |
|---|---|---|---|---|
| १ | 6.1.2.5.B/17.5 | Tablets for Implementation of ANMOL Software (Procurement of laptop/ Tablet) (खरेदी संख्या ८१ संगणकीय टॅबलेट, अंदाजित किंमत प्रति नग रु.१०,०००/-) | 8.10 | 8.10 |

१) सदर औषधी व साहित्य सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू संगणकीय लॅपटॉपचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या सदरील संगणकीय टॅबलेट या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या युनिक विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खा्त्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी

विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्य आरोग्य सोसायटीकडून सन २०१८-१९ साठी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून लेखाशिर्ष FMR Code ६.१.२.५.B/१७.५ मधून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१११२१०५२६८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2019.01.11 12:48:57 +05'30'

(व.मुं. भरोसे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)